<u>कंत्राटी सेवेतील कर्मचाऱ्यांचे परिश्रामिक/मानधन प्रदानाबाबत...</u>

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग,**
**शासन परिपत्रक क्रमांक : संकीर्ण-२०१९/प्र.क्र.२२/कोषा प्रशा ४,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :- २९ जानेवारी, २०२०.

<u>वाचा</u> :-समक्रमांक, दि.१३.०६.२०१९ व दि.१५.०६.२०१९ ची परिपत्रके

<u>परिपत्रक :-</u>

**उपरोक्त विषयी दि.१३.०६.२०१९ चे परिपत्रक दि.१५.०६.२०१९ रोजी संस्थगित करण्यात आले होते. आता प्रस्तुत परिपत्रक आवश्यक सुधारणांसह पुन्हा निर्गमित करण्यात येत आहे.**

२. राज्य शासकीय अधिकारी/कर्मचाऱ्यांची नियमित वेतन देयके संस्करीत करण्यासाठी सेवार्थ प्रणालीचे विकसन करण्यात आले आहे. सेवार्थ प्रणालीव्दारे केवळ स्थायी व अस्थायी पदांवर कार्यरत नियमित राज्य शासकीय कर्मचाऱ्यांची वेतन देयके संस्करीत करणे अभिप्रेत आहे. तथापि, स्थायी व अस्थायी पदांवरील रिक्त जागांवर कंत्राटी/मानधन तत्वावर नियुक्त अथवा निव्वळ तात्पुरत्या सेवेतील कर्मचाऱ्यांचे मानधन/पारिश्रामिक/ठोक रक्कम यांची देयके सुध्दा "०१ वेतन" या उद्दिष्ट शीर्षातून सेवार्थ प्रणालीद्वारे संस्करीत करण्यात येत असल्याची बाब शासनाच्या निदर्शनास आली आहे.

३. सद्य:स्थितीत सर्वसाधारणपणे खालील सेवांचे मानधन/पारिश्रामिक देयक सेवार्थ प्रणालीतून "०१ वेतन" या उद्दिष्ट शीर्षातून संस्करीत करण्यात येत आहेत.

- प्रधानमंत्री ग्रामसडक योजनेतील कंत्राटी कर्मचारी
- प्रादेशिक फॉरेन्सिक विज्ञान प्रयोगशाळेतील कंत्राटी स्वरुपातील कर्मचारी
- विधी अधिकारी
- मानसेवी अध्यापक
- तासिका तत्त्वावर नेमणूक दिलेले कर्मचारी
- बंधपत्रित वैद्यकीय अधिकारी
- रुग्णालयातील तात्पुरत्या स्वरुपातील बदली कामगार म्हणून नियुक्ती दिलेले कर्मचारी
- बंधपत्रित /तात्पुरत्या स्वरुपातील नेमणूक दिलेल्या परिचारीका (Staff Nurses)
- अध्यक्ष, स्थायी लोक अदालत, न्यायिक सदस्य
- विविध समित्यांचे कामकाज पहाण्यासाठी नेमून दिलेले कंत्राटी कर्मचारी
- पुनर्नियुक्तीने नेमणूक परंतु नियमित वेतनश्रेणी न देता ठोक रक्कमेवर असणारे कर्मचारी
- पुनर्नियुक्तीने नेमणूक व नियमित वेतनश्रेणीवर वेतन अदा होत असणारे कर्मचारी

- पोलीस विभागातील नव्याने निर्मित झालेल्या पोलीस तक्रार प्राधिकरणातील ठोक रक्कमेवर नियुक्त केलेले कर्मचारी
- तसेच विविध विभागामार्फत नेमण्यात आलेले कंत्राटी कर्मचारी जे नियमित राज्य शासकीय कर्मचाऱ्यांच्या व्याख्येमध्ये मोडत नाहीत.

४. उपरोक्तप्रमाणे तात्पुरत्या/कंत्राटी/हंगामी सेवेतील कर्मचाऱ्यांना नियुक्ती देताना नियुक्ती आदेशात त्यांचे मानधन, ठोक रक्कम "०१ वेतन" उद्दिष्ट शीर्षातून भागविण्यासंबंधात आदेश निर्गमित केले जातात. तथापि, सदर मानधन/पारिश्रामिक हे "०१ वेतन" या उद्दिष्ट शीर्षातून न काढता ते "१० कंत्राटी सेवा" या उद्दिष्ट शीर्षातून खर्ची टाकणे आवश्यक आहे.

५. **<u>प्रस्तुत वस्तुस्थिती विचारात घेता सर्व प्रशासकीय विभाग व त्यांचे अधिनस्त असलेल्या सर्व आहरण व संवितरण अधिकाऱ्यांना या परिपत्रकाद्वारे सूचित करण्यात येते की,</u>**

(अ) तात्पुरत्या/कंत्राटी/हंगामी कर्मचाऱ्यांचे कंत्राटी स्वरुपातील पारिश्रामिक/मानधन देयक हे सेवार्थ प्रणालीतून "०१ वेतन" या उद्दिष्ट शीर्षातून तयार न करता, महाराष्ट्र कोषागार नियम, १९६८ अन्वये, नेमून दिलेल्या आकस्मिक खर्च देयकाच्या म. को. नि. नमुना आयडी ३१ (MTR-३१) मधील नमुन्यावर "१० कंत्राटी सेवा" या उद्दिष्ट शीर्षातून बिल पोर्टल प्रणालीवरुन तयार करुन कोषागारात सादर करावे. तसेच "१० कंत्राटी सेवा" या उद्दिष्ट शीर्षाखाली अनुदान उपलब्ध होण्यासाठी आर्थिक वर्ष २०२०-२१ च्या अंदाजपत्रकात आवश्यक ती तरतूद करण्यात यावी.

(ब) प्रतिवर्षी अर्थसंकल्पीय अंदाज तयार करताना तात्पुरत्या/कंत्राटी/हंगामी तत्त्वावर कार्यरत कर्मचाऱ्यांच्या मानधनासाठीची तरतूद "०१ वेतन" या उद्दिष्ट शीर्षाखाली न करता ती "१० कंत्राटी सेवा" या उद्दिष्ट शीर्षाखाली करण्यात येईल, याची दक्षता सर्व नियंत्रक अधिकारी व प्रशासकीय विभागांनी घ्यावी.

(क) तात्पुरत्या/कंत्राटी/हंगामी कर्मचाऱ्यांचे पारिश्रामिक/मानधन देयक सेवार्थ प्रणालीतून “०१ वेतन” या उद्दिष्ट शीर्षातून संस्करीत/आहरीत करण्याची सुविधा विधीमंडळाच्या अर्थसंकल्पिय अधिवेशनानंतर **दिनांक १ एप्रिल, २०२० पासून** बंद करण्यात येणार आहे. त्यामुळे प्रशासकीय विभागांनी त्यांच्या अधिनस्त असलेल्या सर्व आहरण व संवितरण अधिकाऱ्यांकरीता तात्पुरत्या/कंत्राटी/हंगामी सेवेतील कर्मचाऱ्यांचे पारिश्रामिक/मानधन अदा करण्यासाठी "१० कंत्राटी सेवा" या उद्दिष्ट शीर्षाखाली

विधीमंडळाच्या अर्थसंकल्पिय अधिवेशनात आवश्यक ती तरतूद करुन त्याचे अनुदान सर्व संबंधितांना उपलब्ध करुन देण्याची दक्षता घ्यावी. अनुदानाअभावी संबंधित कर्मचाऱ्यांचे पारिश्रामिक/मानधन अदा करणे शक्य झाले नाही तर त्यास वित्त विभाग जबाबदार राहणार नाही. त्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित प्रशासकीय विभागाची राहील.

६. **सर्व कोषागारे व उपकोषागारे यांना या परिपत्रकाव्दारे सूचित करण्यात येते की ,**

विधीमंडळाच्या अर्थसंकल्पिय अधिवेशनानंतर, सेवार्थ प्रणालीतून तात्पुरत्या/कंत्राटी/हंगामी कर्मचाऱ्यांचे पारिश्रामिक वेतन “०१ वेतन” या उद्दिष्ट शीर्षातून संस्करीत/आहरीत करण्यापासून बंद करण्यात येणार आहे. जे आहरण व संवितरण अधिकारी तात्पुरत्या/कंत्राटी/हंगामी कर्मचाऱ्यांचे पारिश्रामिक वेतन देयक सद्य:स्थितीत “०१ वेतन” या उद्दिष्ट शीर्षातून कोषागारे व उपकोषागारात सादर करीत आहेत, त्यांना यापुढे सदर पारिश्रामिक/मानधन देयक “१० कंत्राटी सेवा” या उद्दिष्ट शीर्षातून सादर करण्यासाठी आवश्यक असलेले अनुदान विधीमंडळाच्या अर्थसंकल्पिय अधिवेशनात उपलब्ध करुन घेण्याबाबत सूचित करण्यात यावे.

७. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२००१२९१५२०५८२६०५ असा आहे. हे परिपत्रक डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

INDRAJEET SAMBHAJI GORE

Digitally signed by INDRAJEET SAMBHAJI GORE
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=6015944fe7d58a83f4a54c43147b5da1e34861e2984e9f793b66f7249aaa9c1a, postalCode=400032, street=Y-5/66,GOVERNMENT COLONY,MUMBAI,
serialNumber=d4994742192306fcc1dea9aadd3810639506519fa652b919767b98b04e905a18, ou=FINANCE DEPUTY SECRETARY, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=INDRAJEET SAMBHAJI GORE
Date: 2020.01.29 14:58:58 +05'30'

**( इंद्रजित गोरे )**
शासनाचे उपसचिव

**प्रति,**

१. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा / विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
२. सर्व सन्माननीय विधानसभा / विधान परिषद व संसद सदस्य.
३. राज्यपालांचे सचिव.
४. मुख्यमंत्र्यांचे सचिव
५. सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
६. सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग

७. मंत्रालयीन सर्व विभागांच्या अधिनस्त असलेल्या सर्व विभागांचे व कार्यालयांचे प्रमुख
८. प्रबंधक, मूळ न्यायालय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई
९. प्रधान महालेखापाल (लेखा परीक्षा)- १, महाराष्ट्र, मुंबई
१०. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई
११. महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर
१२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर
१३. आयुक्त, आयकर (TDS) चर्नीरोड, मुंबई ४००००२
१४. आयुक्त, आयकर (TDS) सिव्हील लाईन, नागपूर ४४४००१
१५. प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा) मुंबई
१६. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
१७. सचिव, महाराष्ट्र विधीमंडळ सचिवालय, मुंबई
१८. प्रबंधक, लोक आयुक्त व उपलोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई
१९. प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई
२०. मुख्य माहिती आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२१. विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली
२२. सर्व विभागीय आयुक्त
२३. सर्व जिल्हाधिकारी
२४. सर्व जिल्हापरिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
२५. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
२६. अधिदान व लेखाअधिकारी, मुंबई
२७. सहसंचालक, लेखा व कोषागारे,कोकण/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/ अमरावती
२८. मुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई
२९. संचालक, स्थानिक निधी लेखा मुंबई /पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती
३०. वित्त विभागातील सर्व कार्यासने
३१. निवड नस्ती/कोषा प्रशा-४